201102031457410001 पिंपरी-चिंचवड महानगरपालिका

पिंपरी-चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील मंडलाधिकारी, विभागीय अधिकारी या पदांना वर्ग दोनचा दर्जा देऊन त्या पदाची वेतनश्रेणी सुधारणा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र. पीसीसी ३०९१/४७५/प्र.क्र.९१/९१/नवि-२२,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : २२ ऑगस्ट १९९१.

पहा :- १] आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्रमांक प्रशासन/२-अ/कावि १७९/९१/दि. ७.३.१९९१,
२] आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशासन२-अ/कावि ४४५/९१/दि. ५.६.१९९१,
३] आयुक्त, पिंपरी-चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशासन २-अ/४२९/९१/दि.२४.७.९१.

शासन निर्णय :- पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या आस्थापनेवर खालील वर्ग तीन ची पदे कार्यरत आहेत.

| अ.क्र. १ | पदनाम २ | पदनिर्मिती ठराव/आदेश ३ | वेतनश्रेणी ४ | पदसंख्या ५ |
|---|---|---|---|---|
| १. | मंडलाधिकारी | आदेश क्र.जीबी/एमयुएनआय २४७६, दि.२८.११.७४ | रु.रू.५००-९०० | १ |
| २. | मंडलाधिकारी | आदेश क्र.पीजीए १०३, दि. दि.१२.६.७८ | रु.रू.५००-९०० | ४ |
| ३. | कार्यालय अधिक्षक | शासन निर्णय क्र.पीसीसी १३८७/१८४२/प्र.क्र.१७/८८ नवि-२२, दि.१७.२.८८ | रु.रू.५००-९०० | १ |
| ४. | विभागीय अधिकारी | शासन निर्णय क्र.पीसीसी १३८७/१८४२/प्र.क्र.१७/८८/ नवि-२२, दि.१७.९.८८ | रु.रू.५००-९०० | १ |
| ५. | नायब तहसिलदार | मा.स्थायी समिती सभा ठराव ५९५ दि.९.११.८७ | रु.रू.४८०-७७५ | ५ |

मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम ५१ चे पोट कलम ४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन शासन याद्वारे वरील अनुक्रमांक तीनचे पदाचे पदनाम कार्यालय अधिक्षक ऐवजी प्रशासन अधिकारी, करसंकलन व अनुक्रमांक ५ वरील नायब तहसीलदार [क.श्रेणी] पदाचे पदनाम मंडलाधिकारी असे करुन वरील सर्व बारा पदांना वर्ग दोनचा दर्जा देण्यास व त्या पदांची वेतनश्रेणी रु.२०००-६०-२३००-रोध-७५-३२००-१००-३५०० अशी श्रेणी वाढ करण्याच्या महानगरपालिकेच्या प्रस्तावास मंजूरी देत आहे.

शासन असे ही आदेश देत आहे की, वरील श्रेणीवाढ केलेली सर्व पदे महानगरपालिकेच्या कर्मचा-यांमधून कर्मचा-यांच्या सेवा जेष्ठतेनुसारच पदोन्नती भरण्यात यावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

र. गो. साळगांवकर
[ र. गो. साळगांवकर ]
कार्यासन अधिकारी.

प्रति,

आयुक्त,

पिंपरी-चिंचवड महानगरपालिका, पिंपरी, पुणे [५ प्रती].